# अंकुर अक्षरांचे..

## भाग दुसरा

मनातल्या भावनांना अंकुर फुटावेत
अन त्या अंकुरांची अक्षरं उमटावीत..
अक्षरांचे श्वास होता होता
अंकुरल्या भावनांना पानं मिळावीत..

मराठी कविता

साहित्य प्रतिष्ठान

**ई-पुस्तकाचे नाव: अंकुर अक्षरांचे. (भाग दुसरा)**

**संकल्पना: "मराठी कविता" संचालक.**

**रसग्रहण: रंजन कंधारकर**

**मांडणी आणि सजावट: संहिता हिस्वनकर.**

**प्रकाशक: ई-साहित्य प्रतिष्ठान**

**आभार.**

"मराठी कविता" ने आयोजित केलेल्या "अक्षर-अंकुर महोत्सव २०१२" ला आलेल्या उदंड प्रतिसादाबद्दल सर्व सहभागी कवी-कवयित्रींचे हार्दिक आभार. अंकुर अक्षरांचे ही पुस्तक मालिका त्यातीलच निवडक कवितांची बनली आहे.

# दुसऱ्या अंकाची प्रस्तावना:

*अक्षर अंकुर महोत्सवाला आम्हाला उदंड प्रतिसाद मिळाला. ई-साहित्य प्रतिष्ठान च्या सर्व उपक्रमांप्रमाणेच इथेही आमच्या सहभागी मित्र मैत्रिणींनी उत्साह दाखवला. अक्षर-अंकुर चं उद्दिष्ट नव्या कवी-कवयित्रींना लिहितं करणं आणि त्यासोबतच त्यांच्या रचना जगासमोर आणणं हा होता. या महोत्सवात आम्हाला रंजन कंधारकरांसारख्या कवयित्रींचं रसग्रहण लाभलं. फ. मु. शिंदे सरांचे आशीर्वाद लाभले. आपण लिहिलेलं शब्द या शब्दप्रभूंनी वाचावेत यापरतं भाग्य नाही.*

*मागच्या आठवड्यात आम्ही अंकुर-अक्षरांचे या ई-पुस्तक मालिकेचा पहिला अंक प्रकाशित केला. हा अंक संचालकांसाठी देखिल पहिलटकरणीसारखाच अनुभव होता. आपल्याकडे असलेल्या इतक्या उत्कृष्ट शब्दभांडाराला आपण योग्य तो न्याय देऊ शकू की नाही ही देखिल धाकधूक मनात होतीच. पण श्रीगणेशाचं नाव घेऊन अंकाला सुरुवात केली अन आकार दिला. पहिला अंक काढताना खूप काही शिकायला मिळालं आणि एका नव्या कार्याची सुरुवात केल्याचं अप्रतिम समाधान तर होतंच.*

*पहिल्या अंकाचं वितरण पूर्ण झाल्यानंतर आमच्याकडे आलेल्या प्रतिक्रिया खूप बोलक्या होत्या. आमच्या एका सहभागी व्यक्तीने तर आम्हाला फोन करून कळवलं की त्या अंकात आलेली त्यांची कविता त्यांच्या आयुष्यात प्रकाशित झालेली पहिलीच कविता होती. त्यांनी आनंदाने या पुस्तकाच्या प्रती काढून आप्तेष्टांना वाटल्या. याशिवाय उपक्रमावर शुभेच्छा आणि अभिनंदनाचा वर्षाव झाला. जगाच्या कानाकोपऱ्यातून ईमेल आले. आणि सगळ्यांनी खूप कौतुकही केलं.*

*सोबतच काही सूचना ही आमच्या पर्यंत पोहोचल्या. जसं की अंकात असलेल्या कवितांची संख्या वाढावी, डिझाईन करताना शब्दांना अजून थोडा न्याय मिळावा, प्रत्येक कवितेचं वैयक्तिक रसग्रहण द्यावं इत्यादी. यातील शक्य तेवढ्या सुधारणा आम्ही या अंकात करण्याचा प्रयत्न केला आहे.*

*वाचकांना पुस्तक सहजगत्या डाऊनलोड करता यावं यासाठी फाईल ची साईज कमी ठेवावी लागते. त्यामुळे कवितांची संख्या तीच ठेवली आहे. उत्तम कवितांच्या संख्येमुळे वैयक्तिक रसग्रहण देखिल शक्य होऊ शकत नाही. त्याबद्दल दिलगीर आहोत. डिझाईन मध्ये सुधारणा करण्याचा प्रयत्न केला आहे. तो आपल्या पसंतीस उतरेल अशी आशा आहे.*

*अशा प्रकारे रंजन कंधारकरांचे रसग्रहण, फ. मु. शिंदे सरांचे आशीर्वाद आणि प्रकाशकांचं मनोगत तेच ठेऊन, नव्या कविता आणि नवं डिझाईन घेऊन अंक तुमच्यासमोर ठेवत आहोत. रसिकांना आवडेल अशी आशा आहे. आपल्याला अंक कसा वाटला ते जरूर कळवा.*

*संहिता हिस्वनकर*

*samhita.hiswankar@gmail.com*

# रसग्राहिकेचा परिचय:

रंजन कंधारकर यांची खरी ओळख म्हणजे कविताच. त्यांच्या स्वतंत्र शैलीतील कवितांना आजवर अनेक चाहते लाभले आहेत. त्यांच्या अनेक कविता आजवर विविध वृत्तपत्रे, दिवाळीअंक तसेच नियतकालिकांमधून प्रकाशित झालेल्या आहेत. त्यांचा “स्वधा” हा काव्यसंग्रह प्रकाशीत झाला असून त्याला महाराष्ट्र राज्य शासनाच्या “बहिणाबाई चौधरी” पुरस्करासहित तब्बल २१ पुरस्कार प्राप्त आहेत.

कविवर्य लक्ष्मीकांत तांबोळी यांच्या “गोकुळवाटा” या काव्यसंग्रहातिल कवितांच्या अभिवाचनात त्यांचा सहभाग असतो. याशिवायही महाराष्ट्र व गोमांतकात अनेक ठिकाणी त्यांचे काव्यवाचनाचे कार्यक्रम होतात. 'आनंदयात्रा' या बा.भ. बोरकरांच्या व 'रसयात्रा' या कुसुमाग्रजांच्या काव्यवाचन समारंभात त्या सहभागी असतात.

आकाशवाणीवरील कविसंमेलने, पथनाट्य वाचन, मुलाखत इत्यादी कार्यक्रमांत त्या सहभागी होतात. याशिवाय शालेय-महाविद्यालयीन कथा व काव्यलेखन स्पर्धांमध्ये अनेक वेळा त्या परिक्षक म्हणून काम पाहतात.

रंजनताई सध्या 'मधुगंध' काव्यमंडळाच्या कोषाध्यक्षा तसेच 'अक्षरसूक्त' काव्यमंडळाच्या सचिव म्हणून पदभार सांभाळतात. आपल्या शब्दांतून आणि मार्गदर्शनातून त्यांची साहित्यसेवा अविरत सुरू असते. त्यांचा “भूर्जपत्र” हा आगामी काव्यसंग्रह लवकरच आपल्याला पहायला मिळेल.

# रसग्राहिकेचे मनोगत:

अंकुर अक्षरांचे मालिकेतील अक्षरांचे धनी असलेल्या सर्वांचं अभिनंदन !!

~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

अंकुरण हा सृष्टीचा नियम आहे . मग ते पाना पानांचं अंकुरण असो वा मना मनाच ! पानाचं अंकुरण जमिनीशी नातं ठेऊन असत तर मनाचं भावनेशी !!

असे फुटवे अंकुर अक्षरांचे या मालिकेत आपल्याच मस्तीत उगवतांना दिसतात . काही कोवळे , काही गार हिरवे , काही परिपक्व तर काही सुकलेलेही. कवितेच्या रुपात येणारे हे अंकुर एकंदरीतच मनाला हिरवं करुन जातात यातली काही ठिकाण तर केवळ पाचूची आहेत . सती , रुद्रविणा , पाउलवाट , माफीनामा , एकरूप , बिंदू , जन्म कवितेचा , मन , वसंत ऋतू अशी काही नावं नमुन्या दाखल देता येतील . या ठिकाणी मन रमलं नाही तरच नवल .

काही नाजूक वेलींना मात्र अजुन जराश्या आधाराची गरज वाटते . भारंभार वाढलेली शब्धांची पानं ह्या वेलींना उपजत जड करतात . आणि मग हिरवाईचा तोल गेलेला दिसतो . नीटस , नेमकी शब्धरचना ; रचना करता करता पूर्ण कवितेलाच दिलेला सुबक आकार , त्याच त्या अर्थाची कडवी करुन बांडगुळ निर्माण करण्याचा टाळलेला मोह या अगदी छोट्या छोट्या गोष्टी कवितेला उंची देण्याच काम करतात . जसं पिवळी पान , सुकलेल्या फांद्या , शिळी फुलं , आजू बाजूला वाढलेलं तण ह्या गोष्टी काढून टाकल्या की झाड अधिकच मोह घालत , बस , तसच !

अंकुर अक्षरांचे मालिकेतील या कविता रूपातील अंकुरांचा हा महोत्सव मनापासून मनापर्यंत सेतू बांधण्याचे काम मनःपूर्वक करत आलेला दिसतो . अंकुरण्याची त्यांची धून विलक्षण आहे . ही धून , धुनी सारखी चिरकाल तेवत रहो . ही सदिच्छा !!

संबंधित सर्वांचे आभार !

रंजन ..... आतून !!
~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

## कविवर्य फ. मु. शिंदे सरांचे अक्षर अंकुर महोत्सवाला लाभलेले आशीर्वाद:

महोत्सव हा तसा मोहिनीचाच शब्द आहे. अक्षरात अंकुरणारं आकाश असेल तर महोत्सव चंद्र पावतो. कवींचं आकाश चंद्रांचं; कवींचं आणि पुन्हा पुनवेचंही. म्हणून महोत्सव आकाश आणि मातीच्या पुनवेचा चंद्रोत्सवही असतो. 'अक्षर अंकुर महोत्सव २०१२' या उपक्रमात त्याची प्रचितीही आहेच. मुख्य म्हणजे महोत्सवातही उत्कटता.

'अंकुर अक्षरांचे' ही पुस्तक मालिका त्याची म्हणजे महोत्सवाची ई-अभिव्यक्ती आहे. 'ई' हा 'आ'चा प्रत्यय आहे की 'आई'त 'आकाश आणि 'ईश्वर' हा शब्दांचेही अर्थ पावतो. मराठी कविता संचालक मंडळाने अक्षरास अंकुरित करण्याचा आत्मविश्वास दिला, हेच मालिकेचं मोल आहे!

फ. मुं. शिंदे

# कोडं

कोणी वेड्याने काढली, ही शाळा
रोज रोज, अभ्यासाचा कंटाळा
कधीही जा, ह्यांच्या विचित्र वेळा
बघावा लागतो, तो एकच फळा
सकाळी गेले तर, एवढी झोप येते
दफ्तर उशीला घेऊन, झोपावेसे वाटते
दुपारच्या शाळेत पण, झोपच येत असते
कारण पोट छान, भरलेले असते
वाचता वाचता, मिटत असतो डोळा
तरी म्हणणार नाही कोणी, 'जरा झोप बाळा'
बाबा कसे नेहमी, छान टाय लावतात
सुटा-बुटात नेहमी, ऑफिसात जातात
आई कशी नेहमी, छान ड्रेस घालते
छोटीशी पर्स घेऊन, ऑफिसात जाते
ते कसे, त्यांच्या आवडीचे कपडे घालतात
मला मात्र नेहमी, एकच युनिफॉर्म देतात
वाटतं, ह्या जड दफ्तराला दाखवावा माळा
शाळेने दिलाय, नुसता कंटाळा

शाळेतून आल्यावर, आई लागते पाठी,
'होमवर्क करायचा, ठेवलायस कोणासाठी'
घरी नसली तरी, सारखा फोन करते
तिला, स्वस्थ बसायला काय होते
किती केला अभ्यास, तरी समाधान नाही
ह्यांनापण कोणी, अभ्यास द्या काही
हवासा वाटतो, काही वेगळा चाळा
वैताग आणते, ही नुसती शाळा
वाटते कधी इकडे वळू, कि तिकडे वळू
काहीतरी सांगून शाळा, कशी टाळू
वाटतं, दफ्तर रस्त्यातच टाकून धूम पळा

कधीतरी कोणी घाला, ह्या शाळेला आळा
एकट्याने छान टीव्ही, बघितला असता
मला छान येतो, गेमबॉय खेळता
पण वेळ कुठे आहे, हे सर्व करायला
मलाही नको का, काही दुसरा विरंगुळा
वाटतं विसरून सर्व, भरपूर खेळा
गेली तर जाऊ दे उडत, ती शाळा

**प्रतिमा जोशी**

pratimajsh@gmail.com

# आदेश

*मजसाठी योजियले जे, ते कार्य पुरे केले मी*
*आता मज प्रस्थानाचा आदेश मिळावा स्वामी*

*मंतरलेल्या ऊर्मींचे आभाळ पांघरुन झाले*
*चौर्यां्शी लक्षांच्या या चक्रात संचरुन झाले*
*भोवळ येते प्राणांना, आवेग विरावा स्वामी*

*का भ्रामक अनुबंधांच्या वचनात व्यर्थ गुंतावे?*
*जाणीव दुरावत जावी अन् अखेरचे थांबावे!*
*थकलेल्या आसक्तीचा उद्धार करावा स्वामी*

*उसळत्या भोग-योगाच्या उत्कटल्या आतुर वेगा*
*सांभाळावे, अन् घ्यावी झेलून शिरावर गंगा*
*पाताळ गाठण्याआधी आधार मिळावा स्वामी*

*स्वामी, या जड देहाला सूक्ष्मात विलीन करावे*
*भेदून कोश कायेचा प्राणांना मुक्त करावे*
*आत्म्याचा परमात्म्याशी संयोग घडावा स्वामी*

**क्रांति साडेकर**

krantisadekar@gmail.com



# भूमिका

नव्हतेच मुळी मी येथे हा पडदा उठतानाही

अन् पडद्यामागे होते पडदा पडला तेव्हाही

टाळयांवर पडल्या टाळ्या, कौतुकात नाटक सरले

अन् मुख्य भूमिका माझी होती, हे तेव्हा कळले !

हे विचित्र नाटक, ज्याला नाट्याचा गंधहि नव्हता

मी गुंतुन जाण्याजोगा थोडासा बंधहि नव्हता

मी नसतानाही माझ्या नावावर होते चढले

माझ्याविन सर्वांना ते रुचले, पटले, उलगडले

'हे निर्विवाद यश माझे' दिग्दर्शक असे समजला

'ही दाद संहितेसाठी' लेखक या भ्रमात रमला

बोलले समीक्षक, 'अवघे नाटक पुरते भरकटले'

(अन् मुख्य नाट्य होते ते पडद्याच्या आडच घडले!(


## क्रांति साडेकर

krantisadekar@gmail.com

# तिमीरसुक्त

दिशा कोंदट कोंदट...
नभ साचले कित्तेक...
नाही किरणाची आशा..
चिर उभी काळजात...

एक पारवा तो खुळा..
आज गातो पारावर..
धरे साल ती काळाची..
पुन्हा जुन्या घावावर.

सल खोल ती मनाची....
काही चुकार क्षणांची..
दावी भिती तु मनाला..
का रे उगा...अंधाराची

सांज ढळाया लागली...
रात खुलुनी सजली
न जाणे कोणास कशी..
आज चाहुल तुझी लागली.

नवे तिमीराचे सुक्त...
सारे प्रकाशाचे भक्त...
खोल गोठले ते रक्त.?
लढं श्वासांशी तु फक्त

## ओंकार तोरसकर

omkar.pt@gmail.com

# सलाम

आलेल्या प्रत्येक क्षणाला, मनातल्या झळांना

गोड तुझ्या आठवाला, विरहाच्या कळाना

मधुर सुगंधी सहवासाला, मिठीतल्या फुलांना

तुझ्या हळूवार स्पंदनाला, भारावलेल्या श्वासाला

सलाम......

रात्रीच्या त्या शापांना, दिवसाच्या स्वप्नांना

पळालो त्या वाटाना, वाटेतील सोनेरी कट्याना

गडबडलो जिथे त्या फाट्याना, सावरले त्या पट्याना

सांभाळले त्या खांद्याना, विसरलो जिथे त्या फांद्याना

सलाम......

भेटलेल्या लोकांना, माणसातील पशूंना

डावातील कपटाना, पाठीवरल्या हातांना

झुकलेल्या मस्तकाला, क्षमाशील मनांना

ठोकरलेल्या लाथाना, भिजलेल्या डोळ्यांना

सलाम

*माझ्यातल्या मी ला, तुझ्यातल्या तुला*
*भोगलेल्या कौतुकाला, भिरकवलेल्या शिवीला*
*माथ्यावरच्या सुर्याला, मिट्ट काळोख्या रातीला*
*डोळ्यात फेकलेल्या धुळीला, मिळाली स्वप्ने त्या मातीला*
*सलाम.......*

*आलेल्या नाजुक मोक्याला, मिळालेल्या जबर धोक्याला*
*मारलेल्या तुझ्या हाकेला, चुकलेल्या त्या ठोक्याला*
*समाजाच्या धाकेला, नि जखमी त्या डोक्याला*
*जगण्याच्या या भिकेला, लाचार सोसलेल्या टिकेला*
*सलाम........*

*आता येईल त्या दिवसांना, बोलवणार्या हाताला*
*वाट पाहणार्या डोळ्यांना, खुणावणार्या नजरेला*
*धाऊ पाहणार्या पायांना, वाट पाहणार्या घराला*
*मनातील भयाण भीतीना, जगू पाहणार्या जिवाला*
*सलाम........*

**-अमोल कुंभार**

amolskumbhar@gmail.com

# श्रावणमास(विडंबन)

श्रावणमासी खर्च खिशासी चिंता दाटे चोहिकडे
क्षणात येते भरुनि हुडहुडी क्षणात फिरुनी ताप चढे

वरती बघता ग्रहनक्षत्रे फिरती डोळ्यांच्या पुढती
फास बांधला गळ्याभोवती असे भासही मग होती

खिल्लारे रस्त्याने जाता मंगलमय गोमय करती
शिरवे येता पादत्राणे चिकचिक वसने चिताडती

सरलासा हा मास भासतो तोच पारणे ते उपटे
सामानाचा भार पाठिवर खर्चाने छाती फाटे

सुवर्णचंपक, रम्य केवडा तसा मोगरा दरवळतो
कामावरती जातो म्हणता हुकूम गजर्याफचा सुटतो

सायंकाळी घरी परतता अटळच जो नेणे असते
ना न्यावा तर बिस्तर पतिचे नक्की सोफ्यावर जाते

श्रावणमासी सणवारांची रेलचेल असते पुरती
मासे अन मांसाहाराची पुरीच होते गच्छंती

पत्नीच्या व्रतवैकल्यांमधि पती बापुडा अतृप्त
श्रावणमासाचा हा महिमा बालकवींना अनवगत.

-मुकुंद कर्णिक

karnik.mukund@gmail.com

# शब्द

*शब्द सृष्टीच्या उत्पत्तिचा*
*निःशब्दातून आलेला शब्द*

*अशब्दाला शब्दबद्ध करण्याचा यत्न*
*शब्दावाचून नित्य अडणारा शब्द*

*शब्द द्यायचा, शब्द घ्यायचा*
*शब्द पाळायचा, शब्द मोडायचा*

*शब्द तारणारा, शब्द मारणारा*
*शब्द वेडावणारा, शब्द खुणावणारा*

*शब्द भाजणारा, शब्द गोंजारणारा*
*शब्द जिंकणारा, शब्द हरणारा*

*शब्दाला शब्दाचेच अलंकार*
*शब्दाने शब्दाला सजवायचे*

*शब्दापलिकडे पहायचे पण*
*शेवटी शब्दानेच सांगायचे*

*--डॉ जयंत बरिदे*
jayantbaride@googlemail.com

# तू चराचरात आहेस

*मी विश्वास ठेवते यावर*
*मी विचारल की दिसशील का?*
*तू काहीच बोलत नाहीस त्यावर ...*

*अन्तरंग म्हणजे तूच*
*असं तत्ववेत्ते सांगतात*
*मग पापी मनांच काय?*
*अस मी नाही अनेक बोलतात ...*

*तू जाब विचारला*
*तरी उत्तरत नाहीस*
*कधीच कोणाशीच*
*काहीच बोलत नाहीस*

*तू शरमेने काला ठिक्कर*
*पडला आहेस का?*
*ही दुनिया तूच बनवलीस*
*आता हतबुद्ध झाला आहेस का?*

*छे रे सोड या गोष्टी*
*आता तर तुझ अस्तित्वच मानत नाहीत*
*देव कोण तो काय बिघडवेल*
*अस म्हणून शर्मिंदाही होत नाहीत*

*देव माझ्या बोलण्यावर फ़क्त हसला*
*तेव्हा मला अर्थ समजला नाही*
*त्याच्या हास्याने आक्खा समुद्र हिन्दोलला*
*आणि माणूस त्यासमोर कुठचा राहिला नाही*

**स्वरदा येवलेकर**
swarada001@gmail.com

# वादळ आता माणसाळतंय!

उधळत, उसळत,-- थैमान घालणारं,
वादळ आता माणसाळतंय......
उजाड झाले आहेत किनारे
आणि निर्मनुष्य झाल्या आहेत वस्त्या
पाऊलवाटा शोधताना
स्वतः मधेच हरवलंय
पण तरीही ..........
वादळ आता माणसाळतंय !

एकाकी वृक्षावर
विस्कटलेलं घरटं सावरण्यासाठी
-----काडी काडी शोधतंय
कारण
वादळ आता माणसाळतंय!

उगारलेले हात जोडण्यासाठी
दुरावलेली मनं सांधण्यासाठी
आकांतानं तळमळतंय
कारण, वादळ आता माणसाळतंय!

राख पसरली आहे आकांक्षांची
आणि उरले आहेत
काही कोळसे ....... माणुसकीचे
उजाडलेल्या जमिनीवर, हिरवी पात शोधतंय
कारण
वादळ आता माणसाळतंय!

उरल्या नाहीत कसल्या खुणा
अन दीपस्तंभही कोसळलेले
स्मशानवाटेवर... जीवन शोधतंय
कारण
वादळ आता माणसाळतंय!

संघर्ष आहे शाश्वताचा-- अतर्क्याशी
आणि मानवतेचा ---- क्रौर्याशी
सत्यासाठी लढताना थकलंय
तरीही ..........
वादळ आता माणसाळतंय!

**मनिषा भिडे**

manishasni@gmail.com

# माकडराव शहरात…”

माकडराव माकडराव
भिजला का हो तुमचा गांव?
झरझर पडते पडपड पाणी
जंगलात झाडात तुमची राहणी
गावात कशी हो तुमची वस्ती?
रस्त्यावर चालते लोकांशी मस्ती?
बाळांना घेऊन तुमची पळापळ
गाडीवाल्यांची उडते तारांबळ
हातातल्या वस्तु ओढून नका नेऊ
आई म्हणे थांब तुला पोलिसकडे देऊ
सांभाळून हो, तुम्ही आमचे दोस्त
शिस्तीत राहाल तर मजा करु मस्त

शाळेत येता का? बसमधून जाऊ
मधल्यासुट्टीत बागेत कैरी-चिंचा खाऊ
रविवारी टाकूया मल्टीप्लेक्स झकास
नाहीतर लावुया तुमची आमची सर्कस
काय म्हणता तशी आयडीया छान आहे
विदुषकाला आमच्या जीवनात मान आहे
कमाईतून तुमच्या आपण चांगले काम करु
हनुमंताचे वंशज तुम्ही पुण्याची कमाई करु
राम अवतरेल तुमच्यासाठी, रामराज्य येईल का?
इतके अवघड प्रश्न नकोत, कुणी खाऊ देईल का?
थांबा थांबा माकडराव उड्या नका मारू
हा आलोच ताट घेउन अंगत पंगत करु

**-अंबुजा साळगावकर**

ambujas@gmail.com

# " xxxx  अमर रहे

उठा उठा म्हणत बायको थकली !
बिचारीला कुठे माहित, आज निघणार टिकली !

पोरांना वाटले सुट्टीमुळे, झोपलेत पप्पा !
पप्पानी घेतला होता, वरचा टप्पा !

उठत नाही कळल्यावर, डॉक्टरला बोलाविले !
नाडी बघताच, त्यांनी "गेले" खुणाविले !

फोडला होता बायकोने , दीर्घ हंबरडा !
सुटलो कायमचा , खाण्यापासून ओरडा !

सुपुत्राने लावला , मित्रांना माझ्या फोन !
खात्री होतीच, येणार कोण कोण !

सोसायटीच्या बोर्डवर, लिहिली गेली बातमी !
भांडणारेच कुजबुजले , भला माणूस मी !

काहींनी केला हिसाब, किती मी कमाविले !
जाता जाता, LIC ला चांगलेच बुडविले !

झाली सर्व तयारी , जय राम श्री राम जय जय राम !
माझ्या मुळे कंपनीचे, अडले नव्हते काम !

उगाच आयुष्यभर, स्वतःला VIP समजलो !
१३ व्या नंतर, एका भिंतीवर लटकलो !

महिना -वर्ष काढतील, घरचे आठवण !
घास ठेवून कावळ्यास, करतील बोळवण !

महिन्यात रुळतील, हाय काय , नाय काय ,!
जन पळ भर म्हणतील हाय हाय

**गजानन लोखंडे**

gaja.lokhande@gmail.com

# @ संकल्प @

१ जानेवारीलाच, केला होता संकल्प
चालायचे जरा जास्त, खायचे अल्प

आठवड्यातून एकदा, चढायची देवळाची पायरी !
नित्यनेमाने  लिहायची, पानभर डायरी !

शेअर बाजारात घुसायची,  करावी डेरिंग !
वाढदिसाला  सौ.ला,  भेट द्यायची डायमंड रिंग !

सहकुटुंब  जायचे म्हटले एकदा काश्मीर !
बिनापैशाचा मी, सोडत होतो  हवेत तीर !

उद्या पासून करू सुरु  म्हणतो , जात नाही आळस
संकल्प केला नुसता कितीदा,  गाठला मीच कळस !

आजची कामे उद्यावर, पाहिले एकदाचे  यमाने
रेड्याला  सांगितले, आणू  याला विमानाने

आला इमेल यमाचा, “बिनकामाचा तू, न्यायला कधी येवू !
म्हटले त्याला "मी तर ज्युनिअर, , तुझे  चहापाण्याचे पाहू ?

**गजानन लोखंडे**

gaja.lokhande@gmail.com

# DINK चा नको डंका

-DINK° म्हणजे "Double Income No Kid"

मूल आले घरात तर थांबेल चिडचिड
होईल चिवचिवाट आणि खेळण्यांची भीड
विचार कर असा जरा हेका तुझा सोड

DINK चा तुमच्या मारू नका डंका
मोठ्यांच्या सांगण्यात काढू नका शंका
आयुष्यभर पुरत नाहीत आईबाप लेका
बहिणीला बरोबर हवा भाऊराया सख्खा

शिक्षित घरात दिसतो पोरांचा तुटवडा
झोपडपट्टीत मात्र आहे पोरांचा गराडा
करतील चोऱ्यामाऱ्या आणि घालतील दरोडा
वेळ निघुन गेल्यावर गिरवायचा कशाला धडा

करिअर वाल्यांच्या संसारात नाही काही कमी
मग का नाही घुमू देत तिथे बोबडी बोबडी वाणी
वाण्याच्या तराजूनं पैका तुझा तोल
काय करायचा पैका जिथे नाहीत बाळाचे बोल

या कवितेतून उमलो तुमच्यात वंशवेलीची ओढ
गोडधोड करेल आई त्याला नाही तोड
मामा-मावशी, आत्या-काका नात्यांची जोड
घडी घातलेल्या घराची होईल तोडफोड

तुम्हा दोघादोघांना देते मी शुभेच्छा
समाज निपजावा चांगला ही एक इच्छा
अरे, अरे रागवू नका मुलांनो सांगते मी वंदनामावशी
पोटी चाहूल लागता ती लाजेल बघ कशी!

## वंदना धर्माधिकारी

vandana10d@yahoo.co.in



# नोज

सर्दी होता तुझे नोज
गार्डन मधले भासे रोज
रंग होतसे लाईट रेड
इकडे आमचे हार्ट डेड

रुसल्या वरती तुझे नोज
फुग्गुनी घेते लव्हली पोज
लाईट रेड होतो डार्क
डेडल्या हार्टात उडतो स्पार्क

चिडल्यावरती तुझे नोज
रणचंडीचा ऐन्गर शोज
तुझ्या बॉडीला व्हायब्रेशन
डेड हार्टात हायपर टेन्शन

पण.. फक्त तुझे पाहून नोज
माझे हार्ट तुझला चोज
ज्यात लव्हचा करंट फ्लोज
होऊदे  हार्टचे सर्किट क्लोज


अतुल घाटे

atuldghate@gmail.com

# प्रकाशकांकडून दोन शब्दः

मराठी माणूस म्हणजे लढवय्या. मराठी माणूस म्हणजे कला रसिक. मराठी माणसाची ही प्रतिमा इतर लोकांत आहे. योग्यच आहे ते. मराठीत जितकं सुंदर लिखाण झालंय तितकं इतर भाषांत अभावानेच आढळतं.

पण तो झाला इतिहास. मराठीतल्या चांगल्या लेखकांची आणि कवींची यादी करायची झाली तर नांवापुढे कै. जास्त. आणि जे आज आहेत ते सत्तरच्या दशकापुर्वी गाजलेले. गेल्या चाळीस वर्षांत पुढे आलेले लेखक कवी किती ? पुस्तकांच्या प्रदर्शनात गेल्यावर कोणाच्या पुस्तकांना मागणी दिसते. नवीन किती लेखक कवींची पुस्तकं प्रकाशित होतात आणि खपतात आणि वाचली जातात?

नवीन लेखक एका दुष्ट चक्रात सापडले आहेत. पुस्तकं खपत नाहीत म्हणून प्रकाशक पुस्तक प्रकाशित करत नाहीत. आणि प्रकाशक प्रकाशात आणतच नाहीत तर या बिचाऱ्यांची नांवं लोकांपर्यंत जाणार कशी ? आणि लोकांना जर यांचं नांवच माहित नाही तर यांची पुस्तकं खपणार कशी ? आणि पुस्तकं खपत नाहीत तर छापणार कोण ? म्हणजे आलं का संकट ? मग नव्या लेखकांनी लिहावं कसं ? आणि लिहीलं तर त्याचं करावं काय?

याचं उत्तर घेऊन आलं आहे ई साहित्य प्रतिष्ठान. नवीन लेखकांसाठी , ताज्या साहित्यासाठी ई पुस्तकांचं माध्यम घेऊन आम्ही आलो आहोत. तुमचं पुस्तक आम्हाला द्या. ते जाऊ दे लाखो लोकांपर्यंत. लोकांना आवडलं तर लोक दुकानात जाऊनही घेतील. निदान त्या नावाच्या पुस्तकाची चौकशी तर करतील ?

अक्षर अंकुर हा ई साहित्य प्रतिष्ठानचा एक प्रोजेक्ट आहे नवीन टॅलंटचा शोध घेण्यासाठी. पहिल्या राउंडमध्ये आम्ही ७९ नवीन कवींचा शोध घेतला. त्यातले काही फ़ारच चांगले निघाले. काही शिकाऊ आहेत. लवकरच यांच्या साहित्याचा आस्वाद आमच्या सव्वा लाख वाचकांना घेता येईल.

या नंतरचा आमचा टप्पा असेल गद्य लेखकांचा. कथा, कादंबऱ्या, लघुनिबंध, बालसाहित्य अशा सर्व प्रकारांतून नवीन टॅलंट शोधत राहू. खाणीतून कोणतं रत्न निघतं पाहू.

वाचकांना एकच विनंती आहे. हिऱ्यांचा शोध घेताना कोळशाच्या खाणीत उतरावं लागतं. आणि कोळसा कोणता, हिरा कोणता आणि कोहिनूर कोणता हे वाचकच ठरवतील. तेव्हा वाचकांच्या (स्पष्ट) अभिप्रायांची गरज आहे. तसंच ही पुस्तकं तुमच्या मित्र आप्तांपर्यंत जायची गरज आहे. तुम्ही ती फ़ॉरवर्ड करायची आहेत.

बघा . मराठीत जर काही चांगलं निर्माण व्हावं असं वाटत असेल तर तुमचा सक्रिय सहभाग हवा. नाहीतर...

नाहीतर काय ? काही नाही. काहीच नाही.

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरूदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-स्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्ल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील

प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??

फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.

esahity@gmail.com
akshar.ankurmk@gmail.com

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ

www.esahity.com

फेसबुक

https://www.facebook.com/esahity
http://www.facebook.com/groups/kavya.marathi